**जलसंपदा विभागाच्या अधिनस्त कार्यरत कंत्राटदारांकडील बांधकाम कामगारांची नोंदणी व नूतनीकरण करण्याची कार्यवाही तसेच कंत्राटदाराकडून उपकराची वसुली व कंत्राटदारांची नोंदणी १०० टक्के पूर्ण करणेबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक : संकीर्ण ०६१७/प्र.क्र. ३४०/२०१७/मोप्र-१**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक- २१ जुलै, २०१७.

**संदर्भ -**

शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक बीसीए २००९/प्र.क्र. १०८/कामगार ७-अ, दिनांक १७ जून २०१०.

**प्रस्तावना :-**

इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार व सेवाशर्ती नियमन) अधिनियम १९९६ व इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याण अधिनियम १९९६ हे केंद्र शासनाने इमारत व इतर बांधकाम क्षेत्रात कार्यरत असलेल्या बांधकाम मजूरांना, जे राज्य शासनाने गठित केलेल्या इमारत व इतर बांधकाम कल्याण मंडळात लाभार्थी म्हणून नोंदित झालेले किंवा ज्या कामगारांची लाभार्थी म्हणून नोंदणी करण्यात येणार आहे अशा कामगारांचे कल्याण करण्याच्या उद्देशाने पारीत केलेले आहेत. सदर कायद्याची महाराष्ट्र राज्यात अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याण उपकर नियम २००७ तयार करण्यात आले आहेत. या अधिनियमातील तरतुदीनुसार दिनांक २६/६/१९९७ च्या अधिसूचनेप्रमाणे पाच शासकीय सदस्यांचे मंडळ स्थापन करण्यात आलेले आहे.

संदर्भीय शासन निर्णयातील मुद्दा क्र.४ मध्ये सार्वजनिक बांधकाम, जलसंपदा व वन विभागामार्फत केली जाणारी जी कामे “इमारत व बांधकामाच्या परिभाषेत येतात अशा कामांसाठी इमारत व इतर बांधकामाचे कंत्राट घेणा-या कंत्राटदार/अभिकरण यांच्या देयकातून इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याण उपकर विहित दराने वसुल करण्यात यावा”. सदर जबाबदारी संबंधित विभागाची असेल तसेच जी देयके कोषागारात सादर होतील अशा देयकात संबंधित आहरण व संवितरण अधिका-यांने “इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याण उपकर” याची वसुली दर्शवावी व त्यानुसार कोषागाराने सदर वसूली करावी, असे नमुद आहे.

राज्यातील बांधकाम कामगारांची नोंदणी व नूतनीकरण करण्याची कार्यवाही, बांधकाम आस्थापनाकडून उपकराची वसुली व बांधकाम आस्थापनांची नोंदणी १०० टक्के पूर्ण होईल याची

नोंद घेऊन आतापर्यंत विभाग प्रमुखांनी वर्षनिहाय जमा केलेल्या उपकराची रक्कम, बांधकाम व्यवस्थापनांनी केलेली नोंदणी व एकूण नोंदणीकृत केलेले बांधकाम कामगार व कामगारांना नोंदणी/नूतणीकरणकरिता देण्यात आलेले ९० दिवसांचे प्रमाणपत्र इत्यादी बाबतच्या माहितीचा आढावा मा.मुख्यमंत्री महोदयाच्या अध्यक्षतेखाली झालेल्या महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळाच्या दि.२३/६/२०१६ रोजीच्या बैठकीमध्ये घेण्यात आला होता. सदर बैठकीच्या इतिवृत्तातील मुद्दा क्र.२ मध्ये 'महाराष्ट्रातील बांधकाम कामगारांची नोंदणी संख्या वाढण्यासाठी व त्यांना कल्याणकारी योजनांचा लाभ देण्यासाठी सार्वजनिक बांधकाम विभाग, जलसंपदा विभाग, म्हाडा, सिडको, एम.आय.डी.सी. तसेच बांधकाम क्षेत्राशी त्यांच्या क्षेत्रीय स्तरावरील अधिका-यामार्फत बांधकाम आस्थापनांची नोंदणी करण्यासाठी व बांधकाम कामगारास आवश्यक प्रमाणपत्र देण्यासाठी, संबंधीत नियोक्त्यास निदेश देण्याबाबत संबंधितांना आदेश निर्गमित करावेत', असे निर्देश देण्यात आले आहेत.

वरील निर्देशाच्या अनुषंगाने पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

**<u>मार्गदर्शक सूचना</u> :-**

जलसंपदा विभागांतर्गत कंत्राटदारामार्फत करण्यात येत असलेलया विविध कामांवर कार्यरत असलेल्या बांधकाम कामगारांची नोंदणी संख्या वाढवण्यासाठी व त्यांना कल्याणकारी योजनांचा लाभ देण्यासाठी खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

१) शासन निर्णय, उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, क्रमांक बीसीए २००९/प्र.क्र. १०८/कामगार ७-अ, दिनांक १७ जून २०१० मध्ये नमूद केलेल्या कार्यपध्दतीचे पालन करावे.

२) सर्व आहरण व संवितरण अधिकारी तसेच शासकीय अभिकर्त्यांनी / कार्यकारी अभियंत्यांनी महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार (रोजगार व सेवाशर्ती नियमन) अधिनियम - १९९६ मधील उपकर अधिनियमाच्या कलम (३) आणि केंद्र शासनाच्या इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याण उपकर नियम १९९८ च्या नियम (३) नुसार निर्गमित केलेल्या दि.२६.९.१९९६ च्या अधिसूचनेनुसार १ टक्का उपकराची रक्कम कंत्राटदाराकडून वसूल करुन इमारत व बांधकाम कामगार कल्याण मंडळाकडे न चुकता जमा करावी.

३) बांधकाम आस्थापनांची म्हणजे कंत्राटदारांची नोंदणी करण्यासाठी व त्याचेकडील सर्व बांधकाम कामगारांना आवश्यक प्रमाणपत्र देण्यासाठी, कार्यकारी अभियंत्यांनी संबंधित प्रत्येक कंत्राटदारास कार्यारंभ आदेश देतांनाच कळवावे व त्यानुसार याबाबत संनियंत्रण करावे.

४) बांधकाम कामगारांची नोंदणी व नूतनीकरण करण्याची कार्यवाही १०० % पूर्ण करण्याबाबत कार्यकारी अभियंता यांनी त्यांच्या विभागांतर्गत कामे करणाऱ्या सर्व कंत्राटदारांना कामाचा कार्यारंभ आदेश देतांनाच कळवावे. तसेच कार्यकारी अभियंता यांनी कामगार कल्याण उपकराची विहित दराने वसुली करण्याची कार्यवाही १०० % पूर्ण होईल याची दक्षता घेण्यात यावी.

५) सर्व अधीक्षक अभियंत्यांनी आर्थिक वर्षनिहाय जमा केलेल्या उपकराची रक्कम, कंत्राटदारांची केलेली नोंदणी व एकूण नोंदणीकृत केलेले बांधकाम कामगार व कामगारांना नोंदणी/नूतणीकरणकरिता देण्यात आलेले ९० दिवसांचे प्रमाणपत्र, इत्यादी माहिती शासनास सादर करावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१७०७२११५२१५०९१२७ असा आहे. सदर परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tirmanwar Santosh Ramkishan

Digitally signed by Tirmanwar Santosh Ramkishan
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cf0117ad341668a72bc3fcc8a83a2fab1d9b23e2ae276141178afc4dc8b5d790, serialNumber=37b5be33c57130083d7c9245fb12e91e0019861744c920676df5a5236c14b3a2, cn=Tirmanwar Santosh Ramkishan
Date: 2017.07.21 15:20:16 +05'30'

**( सं. रा. तिरमनवार )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत-**

१) अपर मुख्य सचिव, उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळे
३) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.